# समिधा

लेखक:

**कुसुमाग्रज**

किंमत ३ रुपये

प्रकाशकः—
रा. ज. देशमुख
देशमुख आणि कंपनी
१९१ शनवार, पुणें २


(२) मुखपृष्ठावरील 'चित्र'
दीनानाथ दलाल यांचें आहे.

मुद्रक:—
स. रा. सरदेसाई,
बी.ए., एल्एल्. बी.,
नवीन समर्थ विद्यालयाचा
समर्थ भारत छापखाना,
४१ बुधवार, पुणें २.

श्री. भाऊसाहेब खाण्डेकर
यांस सादर समर्पण

## जीवन



आकाशाच्या सरोवरांत
पृथ्वीचें हें विराट कमलपुष्प उमललें आहे
आणि तो भ्रमर-चंद्र
आपले रुपेरी पंख पालवून
त्या कमलाभोंवतीं अखंड गुंजारव करीत आहे
या कमलाच्या पाकळीवर
एक सुन्दर दंवबिंदु पडला आहे
त्याचें नांव जीवन !

## अग्नीचा स्मृति-दिन २

आदिविश्वांतील तो अंधार अथांग, अनंत आणि असीम होता. कालाच्या बंधनांनीं न जखडलेली अशी ती एक विराट् अमावास्या होती !

त्या अफाट काळोखांत कालपुरुष अगतिकपणें हिंडत होता, चांचपडत होता, ठेंचाळत होता.

परंतु त्या गहन अंधारांतच अग्नीचीं, प्रकाशाचीं बीजें होतीं.

त्यांचा उदय झाला. काळोखाच्या त्या असीम माळावर अग्नीचे अंकुर फुलूं लागले, बहरूं लागले.

तेजाचीं विराट्-वलयें अवकाशांत संचार करूं लागलीं.

हे तेजोगोल हातावर झेलीत आणि नाचवीत कालपुरुष आनंदानें तांडव करूं लागला.

त्या तांडवाच्या वादळांत कांहीं तेजोगोलांच्या ज्योति मालवल्या. पृथ्वीची गणना या विझलेल्या तेजोगोलांत होती.

त्या विझलेल्या अग्नीचा आज स्मृतिदिन आहे !

× × ×

रात्रीं पहाडाच्या आश्रयानें पडलेला मानव आकाशांतील तेजस्वी तारकांकडे कुतूहलानें पाही

वर्षाकालांत मेघांच्या गुहेंतून कडकडत बाहेर येणाऱ्या विद्युल्लतेकडे पाहून तो स्तिमित होई

उषःकालच्या सोनेरी तेजोरेषा क्षितिजावर प्रकट होतांच तो उल्हसित होई

आणि अजाण कृतज्ञतेनें त्याचे हात छातीवर जुळून येत.

त्याच्या मनांत विचार आला, या स्वर्गीय अग्नीचा अंश आपल्याला कधीं लाभूं शकेल काय ?

अग्नीसाठीं स्फुरलेल्या त्या मानवी आकांक्षेचा आज स्मृतिदिन आहे !

× × ×

शतकांमागून शतकें गेलीं. मानवाचा अग्नीचा शोध चालू होता. त्याची तपश्चर्या अखेरीं सफल झाली.

मानवाला दावानलाचें दर्शन झालें. पृथ्वीवरील प्रकाशाचा पहिला साक्षात्कार झाला.

तो बेहोश होऊन आनंदानें नाचूं लागला. अग्नीचा उदय संघर्षांत आहे हें त्याला समजलें.

निसर्गाच्या स्वाधीन असलेली ही दिव्य दौलत हस्तगत करण्यासाठीं तो खपूं लागला.

आणि पाषाणखंडाचे परस्परांवर प्रहार करून त्यानें पहिली ठिणगी पाडली.

त्या पहिल्या ठिणगीचा आज स्मृतिदिन आहे!

× × ×

कालप्रवाह वाहत होता.

अहिल्येप्रमाणें शिलाखंडांतून बाहेर पडलेल्या त्या ज्योतीनें माणसाचें जीवन उजळ केलें.

त्याच्या आयुष्यांत प्रकाशाचा प्रवेश झाला.

त्याच्या घरांत चूल पेटली.

पणतीच्या किरणांनीं घरादारांतील अंधारावर सुवर्ण पुष्पांची पखरण केली.

त्या पहिल्या पणतीचा आज स्मृतिदिन आहे!

× × +

अग्नीच्या आणि प्रकाशाच्या पूजनानें हा मंगल दिन आपण साजरा करूं.

अग्नीचा प्रत्येक स्फुल्लिंग आणि प्रकाशाची प्रत्येक शलाका आज वंदनीय मानूं.

अनंत अवकाशांत जन्मलेल्या या दैवतासाठीं भक्तिभावानें आपल्या अंतःकरणाचीं मंदिरें करूं.

जेथें तो जागत असेल तेथें त्याला जागता ठेवूं. जेथें तो मालवला असेल तेथें त्याला जाग आणूं.

आपण अग्निमय होऊं!

## रिकामें देऊळ

३

माझ्या हृदयाचें हें देऊळ वैभवशाली आहे

त्यावर असलेले कल्पनांचे सोनेरी कळस आकाशगामी आहेत.

विविध भावनांच्या भव्य मंडपांनीं तें सुशोभित आहे.

सर्वांत थोर अशा शिल्पकारानें रचलेलें हें एक नवलपूर्ण शिल्प आहे.

परंतु हें देऊळ रिकामें आहे.

या देवळाच्या दाराशीं माझा अहंकार बसला आहे.

कोणालाहि तो आंत प्रवेश करूं देत नाहीं.

देव्हाऱ्यांत राहण्यासाठीं अनेक दैवतें, अनेक भक्तिभावना, अनेक श्रद्धा या रिकाम्या देवळाच्या दाराशीं आल्या आणि त्यांनीं प्रवेशाची सिद्धता दर्शविली.

पण दाराशीं पहारा करणाऱ्या अहंकारानें त्या सर्वांना प्रतिबन्ध केला !

हा रखवालदारच अखेरीं या मंदिराचा स्वामी आणि देव्हाऱ्यांतील देव होणार आहे काय ?

*

## तपश्चर्या

५

पारिजातकाच्या झाडास त्या वेळीं अशीं सुन्दर सुगंधी फुलें येत नव्हतीं. कसला तरी गंधहीन आणि सौंदर्यहीन मोहर येई आणि मातीला मिळून जाई.

इतर वृक्षांचें आणि फुलझाडांचें वैभव पाहून पारिजातकाच्या अंतःकरणांत असूया उत्पन्न झाली, तो दुःखी होऊं लागला.

सभोंवारचीं सुन्दर झाडें त्याच्या दुःखाची कुचेष्टा करूं लागलीं, त्याच्या विषादाचें विडंबन करूं लागलीं !

पारिजातकानें ठरवलें, जगांतील कोणत्याहि

वृक्षाजवळ नसलेलें वैभव आपण मिळवलें पाहिजे, वाटेल तें करून सर्व वनस्पति-सृष्टींत श्रेष्ठत्व संपादन केलें पाहिजे.

त्यानें तपश्चर्या करण्यास सुरवात केली.

त्याच्या नम्र मस्तकावरून कालप्रवाहाच्या असंख्य लाटा गेल्या, अगणित वादळें गेलीं, अनेक वणवे गेले.

पण त्याचा निर्धार ढळला नाहीं. तो खालीं मान घालून तपश्चर्या करीत राहिला.

अखेरीं त्याचें तप सफल झालें. परमेश्वर त्याच्या-पुढें येऊन उभा राहिला. 'वर माग' म्हणून पारिजातकास त्यानें आज्ञा केली.

तपाला बसतेवेळीं मनांत असलेली इच्छा पारिजातकानें, दीर्घ श्रमाच्या ग्लानीमध्यें बोलून दाखवली.

तो म्हणाला—चांदण्यासारखीं सुन्दर, निशि-गंधासारखीं शुभ्र, कमलासारखीं आरक्त, ज्यांचा गंध मधुर आहे पण उद्दाम नाहीं अशा पुष्पांचा विपुल फुलोरा मला लाभावा.

ईश्वरानें त्याची इच्छा सफल केली. स्वर्गांत

शोभण्यासारख्या सुंदर फुलांनीं पारिजातक बहरून गेला. जणूं असंख्य स्वप्नांचा थवाच त्याच्या फांद्यां-वर येऊन बसला होता !

परिमलाच्या द्वारां त्याच्या वैभवाचें वृत्त साऱ्या रानांत पसरलें. सर्व वृक्ष त्याच्यापुढें नम्र झाले. त्यांनीं पारिजातकाचा जयजयकार केला.

पारिजातकानें डोळे उघडले. आपलें अतुल वैभव त्याच्या दृष्टीस पडलें. त्याची ग्लानी उतरली. तो आवेशानें उद्गारला, " मी तापसी आहें ! मला हें वैभव काय करायचें ?"

आपल्या देहावर बहरलेली ती सारी संपदा त्यानें खालच्या धुळींत टाकून दिली !

## स्वप्नमंजुषा 

आकाशांत चंद्रोदय झाला.

चंद्राचे निळसर किरण गवाक्षांतून माझ्या शय्येवर आले.

मी उठलों आणि दार उघडलें.

तूं जादूगार दाराबाहेर उभा होतास !

सहस्रावधी स्वप्नांनीं भरलेली चंदेरी मंजुषा तूं माझ्यापुढें केलीस.

आणि मला सांगितलेंस, यांतील एका स्वप्नाची निवड कर.

मी पाहूं लागलों. स्वप्नाची निवड करूं लागलों.

सागरासारखीं निळीं, उषःकालासारखीं सोनेरी, शुक्रासारखीं तेजस्वी आणि इंद्र–धनुष्यासारखीं सप्तरंगी अशीं स्वप्नें होतीं तीं !

सारींच मृगजलासारखीं मोहक होतीं !

मी भांबावून गेलों आणि प्रत्येक स्वप्नाचें सौंदर्य पाहूं लागलों.

जादूगारा, तूं तिष्ठत उभा होतास हें मी विसरलों, एका स्वप्नाची निवड मला करावयाची होती याचें मला विस्मरण झालें.

स्वप्नामागून स्वप्न मी पाहूं लागलों आणि त्यांतच सारी रात्र संपून गेली.

आकाशांत अरुणोदय झाला आणि त्या ज्वाला-मय प्रकाशांत, हे जादूगारा, तूं आपल्या स्वप्नांसह अदृश्य झालास !

## अखेरचें दर्शन

७

सर्वत्र शांतता आणि काळोख पसरल्यावर, एका भडकलेल्या चितेंतील प्रेतानें

सभोंवारच्या ज्वाला मच्छरदाणीच्या पडद्याप्रमाणें हातानें हलकेच बाजूला केल्या

आणि बाहेर डोकावून पाहिलें.

शेजारच्या चितेवरील प्रेतहि बाहेर डोकावून पाहत होतें.

पलिकडच्या चितेवरचेंहि तसेंच.

पहिल्या चितेंतील प्रेत हलकेंच उठलें आणि खालीं उतरलें. नंतर दुसरें, नंतर तिसरें...

क्षणभरांत सारें स्मशान प्रेतांच्या हालचालीनें गजबजून गेलें.

एखादी सावल्यांची यात्रा प्रवासाला निघावी—

त्याप्रमाणें तीं सर्व कलेवरें मूकपणें चालूं लागलीं.

स्मशानाजवळ असलेल्या नदीच्या तीरावर येऊन सर्वांनीं पलिकडे पाहिलें.

त्या वैभवशाली नगरांतील उंच इमारतींचे अग्र भाग,

देवळांचे आकाशगामी कळस,

प्रार्थना-मंदिराच्या घुमटावरील क्रूस,

मशिदींचे मनोरे !

शहरांतील दिव्यांचा संकलित धूसर प्रकाश भूतकाळाप्रमाणें त्या सर्वांवर भुरभुरत होता.

नदीच्या प्रवाहावरून तो प्रेतांचा थवा शहरांत जाण्यासाठीं निघाला.

उत्तररात्रींच्या भयाण शान्ततेंत–

शहराच्या निर्जन रस्त्यांतून तीं प्रेतें संचार करूं लागलीं.

याच रस्त्यांत त्यांच्या मानवी जीवनाचा समारोप झाला होता.

जीवनाचा संहार करणारी ती भूक त्यांना आतां जाणवत नव्हती

पण अंतकाळीं अंतःकरण जाळणाऱ्या भुकेच्या वासनेनें त्यांचीं छायामय शरीरें प्रक्षुब्ध झालीं होतीं.

अन्नाचें अखेरचें दर्शन घेण्यासाठीं तीं प्रेतें रस्त्यारस्त्यांतून फिरूं लागलीं.

त्यांची इच्छा पुरी झाली.

एका सुंदर, विलासी प्रासादाच्या जवळ सुग्रास अन्नाची छोटीशी रास धुळीमध्यें पडली होती.

एक कुत्रा धुळीशीं एकरूप झालेल्या अन्नाचें सेवन करीत होता.

प्रेतें थांबलीं.

परस्परांच्या हातांत हात घालून त्यांनीं रिंगण धरलें आणि अमानुष आनंदानें बेहोष होऊन त्या राशींभोंवतीं तीं फेर धरून नाचूं लागलीं.

अज्ञात अशुभाच्या जाणीवेनें कुत्रा विव्हळूं लागला.

प्रेतांची वासना पुरी झाली.

पहांटच्या सुमारास तीं पुन्हा स्मशानांत परत आलीं

आपापल्या सरणावर जाऊन त्यांनीं ज्वालांचीं पांघरुणें आंगावर ओढलीं

आणि तीं झोंपी गेलीं !

## कारागृह

८

या कारागृहांतून मी कधीं मुक्त होणारच नाहीं का ?

सोनेरी उन्हाचा कवडसा गवाक्षांतून माझ्या अंगावर आला कीं रोज मला आशा वाटते

आज मुक्ततेचा सुवर्ण दिन उगवला आहे !

दिवसाबरोबर ती आशाहि क्षणाक्षणानें मावळते

आणि रात्रपक्षी गवाक्षाच्या गजांवर फडफडूं लागल्यावर माझें अंतःकरण रात्रीप्रमाणें अंधारमय होतें.

× × ×

मुक्त करायचेंच नाहीं तर या बंदिगृहाला हें गवाक्ष तरी कां ठेवलेंस ?

तासन् तास त्या लोखंडी गजांजवळ मी उभा राहतों

आणि बाहेर क्षितिजापर्यंत पसरलेल्या स्वतंत्र जगाचें दर्शन घेतों.

माझ्या आशा आपले पंख पसरतात.

आणि त्या अथांग जगाच्या कानाकोपऱ्यांतून विहार करतात.

लोखंडाच्या हिम स्पर्शानें मी शेवटीं भानावर येतों

दूर गेलेले माझ्या आशांचे पक्षी

जखमी होऊन माघारीं येतात

आणि अंतःकरणाच्या घरट्यांत रक्तबंबाळ होऊन पडतात !

× × ×

केव्हांतरी मला मुक्त करणार असशील तर लौकर कर.

मला आतां भीति वाटूं लागली आहे.

या काळ्याकाभिन्न चिरेबंदी भिंतींची नव्हे,

या भयानक एकान्ताची नव्हे,

नागाप्रमाणें विळखा घालणाऱ्या या शृंखलांचीहि नव्हे.

तर या सर्वांसंबंधीं मला वाटणारा द्वेष नष्ट होण्याची !

पारतंत्र्यप्रिय होण्यापूर्वी
स्वातंत्र्यावरील श्रद्धा नाहींशी होण्यापूर्वी
माझ्यांतील मी मरून जाण्यापूर्वी
मुक्त करणार असलास तर मला मुक्त कर !

## रहस्य



तूं निरोप घ्यायला समोर आलीस तेव्हां तुझ्या ओठावर स्मित होतें आणि डोळ्यांत आंसवें होतीं.

उषःकालच्या उमलत्या फुलावर दंवाचा थेंब तरंगत होता.

पर्जन्याच्या रुपेरी तारांतून इंद्रधनुष्याचें दर्शन होत होतें.

मी हांसून तुला निरोप दिला आणि तूं निघून गेलीस.

तुझ्या हृदयावरची जखम मला दिसत होती.

अश्रूंचें उत्तर तुला अश्रूंनींच हवें नव्हतें का ?

तूं मागें वळून पाहिलें नाहींस.

× × ×

दोघांतील दुरावा वाढविणाऱ्या त्या क्रूर रस्त्यावर आपलीं विषण्ण पावलें टाकतांना तूं मनांत म्हणाली असशील

किती कठोर आहे तो !

आणि आजहि, त्या दूरच्या स्थळीं, ते चार शब्द उच्चारासाठीं अधीर होऊन पुनः पुन्हा तुझ्या ओंठावर धाव घेत असतील.

शिणून भागून बिछान्यावरती पडल्यावर

तूं आपल्या स्मृतीचीं निरांजनें एकावर एक पेटवशील आणि त्या प्रकाशांत मला उभा करून म्हणशील

फार कठोर आहेस तूं !

नदीतीरावरील एखाद्या आरक्त सायंकाळीं, कोणा प्रिय सखीला तूं आपल्या अंतःकरणाची कहाणी सांगशील

आणि पाण्याच्या चंचल लहरींवर दृष्टि लावून शेवटीं उद्गारशील

तो फार फार निर्दय आहे !

एखाद्या मेळाव्यांत माझ्याविषयीं कधीं बोलणें निघालें कीं तूं उत्साहानें माझें गुणसंकीर्तन करशील, माझ्या सौजन्याची प्रशंसा करशील

आणि त्याच वेळीं तुझें अंतःकरण तुझ्या ओठांना म्हणेल, किती खोटं बोलतां आहांत !

उत्तर रात्रींच्या स्वप्नांत मी तुझ्याकडे येऊन तुझ्या केसांवरून हात फिरवूं लागलों कीं तो हात कोपानें दूर करून तूं जागी होशील आणि म्हणशील

पुरे, मला ठाऊक आहे.!

× × ×

पण खरोखर तुला ठाऊक नाहीं.

तुझ्या अश्रूंचें उत्तर मी अश्रूंनींच दिलें होतें हें तुला ठाऊक आहे का ?

मी हांसून तुला निरोप दिला

तूं दृष्टीच्या कक्षेंत होतीस तोंपर्यंत माझ्या ओंठावर तें हास्य रेंगाळत होतें.

परन्तु तूं दिसेनाशी होतांच

माझी नजर अश्रूंनीं अंधुक झाली

मला कांहींच दिसेनासें झालें !

पण माझी अहन्ता माझ्या प्रेमापेक्षां प्रभावी आहे. माझ्या अश्रूंचें हें रहस्य तुला कधींहि कळणार नाहीं !

## मातीचे घडे

## १०

घटशाळेंत बसून तो मातीचे घडे तयार करीत होता.

गांवांतील कांहीं श्रेष्ठ जन त्याच्या घटशाळेंत आले आणि त्याला म्हणाले

—वेड्या, कां उगाच मातीचे घडे तयार करण्यांत वेळ घालवतोस तूं? कितीहि कारागिरी केलीस तरी हे घडे अल्पजीवी ठरणार!

—हे तुझे घडे काळावर विजय मिळवूं शकतील कां?

—त्यापेक्षां संगमरवराच्या सुन्दर शिल्पकृती तयार कर, त्या अमर होतील आणि तुझी कीर्तिहि अमर करतील!

घटकारानें त्यांना अभिवादन केलें आणि समोर असलेल्या घड्यांच्या रांगेकडे स्नेहमय दृष्टीनें पाहत तो उत्तरला,

हे रिकामे घडे घरोघर पाण्यानें भरून जाणार आहेत ! माझ्या कीर्तीच्या अमरतेपेक्षां यांत पुढें ओतल्या जाणाऱ्या जीवनाचे अधीर, उल्हासदायक आणि मंजुळ तरंगच मला अधिक आकर्षक वाटतात. मी शिल्पकार नाहीं, घटकार आहें, आणि त्यांतच मला आनंद व अभिमान वाटतो.

## शिल्पकार

## १२

आपल्या छोट्या कलामंदिरांत बसून तो संगमरवराची मूर्ति घडवीत होता.

गांवांतील कांहीं थोर पुरुष त्याच्या कलामंदिरांत आले आणि त्याला म्हणाले, "कां आपल्या श्रमांचा आणि कलेचा दुरुपयोग करतोस तूं ?"

—या मूर्तीचा जगाला काय उपयोग ?

—पाषाणांतून कितीहि सौन्दर्य तूं निर्माण केलेंस तरी तो पाषाणच !

—त्यापेक्षां तूं मातीचे घडे बनवशील तर ते सर्वांच्या उपयोगीं पडतील.

—घरोघर तुझे घडे पाण्यानें भरतील आणि तुला लोकांचा दुवा मिळेल.

समोरच्या मूर्तीकडे अभिमानानें पाहत शिल्पकार म्हणाला, या मूर्तीचा कोणाला उपयोग होणार नसेल पण तींत माझ्या स्वतःच्या जीविताची सफलता आहे. घडे करायला मी असमर्थ आहें. मी केवळ शिल्पकार आहें.

## मागणें

१३

माझें मागणें फार थोडें आहे.

तुझ्या अस्तित्वाची एखादी अस्पष्टहि खूण मला दिसूं दे.

तुझ्या महात्म्याची मीमांसा मीं अनेकांकडून ऐकली.

तुझ्या गुणांचें संकीर्तन करणारीं रसाळ काव्यें मीं वाचलीं.

संगमरवरी शिल्पांतून कोरलेल्या तुझ्या मनोहर मूर्ति मीं पाहिल्या.

त्या सर्वांवर श्रद्धा ठेवून मीं डोळे मिटले आणि भक्तिभावानें तुझी पूजा केली.

पूजा संपल्यावर डोळे उघडून मीं सभोंवार पाहिलें—

पण तुझ्या अस्तित्वाची खूण मला कोठेंहि दिसली नाहीं.

म्हणून—

माझें मागणें फार थोडें आहे.

तुझ्या अस्तित्वाची एखादी अस्पष्टहि खूण मला दिसूं दे.

× × ×

मीमांसाग्रंथांतून मीमांसकांच्या बुद्धीचा मला साक्षात्कार झाला.

तुझें गुणगायन करणाऱ्या सुंदर काव्यांतून कवींच्या प्रतिभेचें मला दर्शन झालें.

संगमरवरी शिल्पकृतींतून शिल्पकारांची कला समजली.

पण तुझ्या अस्तित्वाची खूण त्यांत कुठें होती ?

तें सारें मानवी चातुर्य होतें, मानवी कला होती.

मीहि बुद्धिमान् असतों तर तुझ्या अस्तित्वाची मीमांसा केली असती, प्रतिभावान् कवि असतों तर तुझ्यावर काव्यें लिहिलीं असतीं, कलावान् शिल्पकार असतों तर तुझी मूर्ति घडवली असती.

आणि हें सारें करूनहि तुझें अस्तित्व मला अज्ञात राहिलें असतें !

आणि म्हणून—

तुझ्यापाशीं माझें एकच मागणें आहे

तुझ्या अस्तित्वाची एखादी अस्पष्टहि खूण मला दिसूं दे.

# सराईचा स्वामी

## १४

वाळवंटांतून प्रवास करीत असतां तो तृषार्त झाला.

सुदैवानें जवळच एक सराई होती.

सराईच्या ओट्यावर पांथस्थांसाठीं गार पाण्याचे घडे भरून ठेवले होते. ओट्याजवळ जाऊन त्यानें एक घट उचलला आणि ओठाला लावला.

तेवढ्यांत त्याच्या मनांत विचार आला, ही जलदानाची व्यवस्था ज्या थोर गृहस्थानें केली त्याला प्रणाम केल्याशिवाय पाणी पिणें म्हणजे कृतघ्नता आहे.

घडा खालीं ठेवून तो सराईच्या मालकाची चौकशी करूं लागला.

परंतु सराईमध्यें सारे त्याच्यासारखेच मुशाफर होते.

त्या थोर माणसाविषयीं त्यांना कांहींच ज्ञान नव्हतें.

पाणी भरणाऱ्या पखालजीला त्यानें विचारलें. तो उत्तरला, "मला ठाऊक नाहीं. रिकामे घट भरणें हा माझा धंदा आहे. धंद्याबरोबर थोडं सत्कार्य व्हावं म्हणून हे घडेहि मी येतां जातां भरून ठेवतों. लोक कांहीं देणगीहि देतात."

जवळच असलेल्या लहान खेड्यांत पांथस्थ गेला आणि घडे करणाऱ्या कुंभाराची त्यानें गांठ घेतली.

कुंभार म्हणाला, "मला माहीत नाहीं. मातीचे घट करणें हा माझा धंदा आहे. जरूर असेल तर चार घट मी सराईत नेऊन ठेवतों. तेवढाच मुशाफरांचा दुवा मिळतो."

पांथस्थ गांवांत घरोघर फिरला. पण कोणालाच कांहीं सांगतां आलें नाहीं. अखेरीं एका अत्यंत वृद्ध गृहस्थाला त्यानें तो प्रश्न विचारला.

वृद्ध म्हणाला, "सराई कोणीं बांधली हें कोणालाच ठाऊक नाहीं. मीं माझ्या जन्मापासून

ती पाहिली आहे, माझ्या वडलांनींहि पाहिली आहे. तो उपकारकर्ता या पृथ्वीवर असणें शक्य नाहीं!"

पांथस्थानें विचार केला, जो पृथ्वीवर नाहीं तो आकाशांत असला पाहिजे. सराईजवळ येतांच त्यानें आकाशाकडे पाहून अभिवादन केलें आणि नंतर पाणी पिण्यासाठीं एक घट उचलला.

हा वेळपर्यंत त्याच्या बरोबरचे प्रवासी फार पुढें निघून गेले होते!

रक्तांत नाहलेल्या या दलिताला
वेशीच्या बुरुजावर उभा राहून मी छातीशीं धरीत आहें !
प्राज्ञा असेल त्यानें पुढें येऊन प्रतिकार करावा,
शापवाणीचा उच्चार करावा !
या अंतःकरणांतलें तेज, या मनगटांतलें बळ तुम्ही जाणतां.
आजपर्यंत तुमच्या सेवेसाठीं
तुमच्या संरक्षणासाठीं
त्या तेजाचा, त्या बळाचा व्यय झाला
—आज तो तुमच्या संहारासाठीं होईल !

आजपर्यंत तुमच्या चरणांला स्पर्श करणारें सामर्थ्य आज तुमच्या वक्षःस्थळांवर प्रहार करील !

तुम्ही पायांखालीं तुडवलेल्या या दुर्बळाला मीं उचललें आहे.

तुम्हीं केलेल्या कठोर जखमांतील रक्त मीं पुसलें आहे.

तटासमोर उभे राहून तुम्ही त्याच्या प्राणासाठीं कोलाहल करीत आहांत—

पण कृतान्तालाहि जिंकणारें हें तेज

या विद्ध्राचें रक्षण करील

आणि तुमचा संहार करतांनाहि मला समाधान लाभेल कीं, मी तुमची सेवाच करीत आहें.

कारण तुम्ही स्वतःचे वैरी झालां आहांत !

ते सातहि ऋषी वृद्ध होते.

त्यांच्या पांढऱ्या सफेत दाढ्या छातीच्या खालीं गेल्या होत्या आणि डोक्यावरील शुभ्र जटा रुप्याच्या उंच टोपांसारख्या दिसत होत्या.

एकमेकांत ठराविक अंतर ठेवून ते ध्रुवाच्या भोंवतीं प्रदक्षिणा घालीत होते.

कोणीहि बोलत नव्हते, थांबत नव्हते अथवा इकडेतिकडे पहात नव्हते. खालीं मान घालून सारेजण चालत होते, सारखे चालत होते.

त्यांची निष्ठा अपूर्व होती. या निष्ठेनेंच त्यांच्या वृद्ध पायांत अदम्य सामर्थ्य निर्माण केलें होतें.

त्यांचा हा अनंतकालीन प्रवास चालू असतां एकदां कांहीं तरी उत्पात झाला आणि एक मोठा थोरला धूमकेतु त्यांच्या समोर येऊन उभा राहिला.

अवकाशांत स्वच्छंदानें मुशाफरी करणाऱ्या धूमकेतूला त्या सात वृद्ध ऋषींचा हा उपक्रम पाहून नवल वाटलें. तो कुतूहलानें त्यांच्याबरोबर चालूं लागला आणि चालतां चालतां त्यानें विचारलें,

" मुनींनो, कां आपण असें भ्रमण करीत आहांत?"

कोणींहि त्याला उत्तर दिलें नाहीं. सर्वांनीं त्याच्याकडे एकेक कटाक्ष टाकला आणि आपला प्रवास पुढें चालू ठेवला.

धूमकेतूनें सभोंवार पाहिलें. सात ऋषींच्या मागें एक वृद्ध स्त्रीहि झपाट्यानें चालत असलेली त्याला आढळली.

त्यानें विचारलें, " ऋषिजनहो, ती स्त्री आपल्या पाठीमागें लागली आहे म्हणून आपण असें फिरतां आहांत काय ? "

सर्वजण संतप्त आणि उद्विग्न झाले. आतां बोलण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. " आम्हीं सर्वजण अनंत काळापासून त्या ध्रुवाभोंवतीं प्रदक्षिणा घालीत आहोंत ! " एक ऋषि म्हणाला.

" कशाकरतां ? "

" हें पूजन आहे, ही भक्ति आहे ! "

" परंतु या भक्तीनें तुम्ही आपल्या दैवताच्या-जवळ जाऊं शकतां का ? पूर्वीइतकेंच तुमच्यापासून तें दूर आहे ! "

ऋषिमंडळ कांहींसें विचलित झालें. परंतु एकजण निग्रहानें उत्तरला, " आमचें सुख साधनेचें आहे, साध्यसंपादनाचें नाहीं. "

" तुम्ही खरोखरी सुखी आहांत काय ? " धूम-केतूनें विचारलें.

सातहि ऋषींचे चेहरे अस्वस्थतेनें भारावून गेले.

धूमकेतु म्हणाला, " मला वाटतं, अन्तराळांत तुमच्याइतकें दुःखी कोणीहि नाहीं. माझ्याबरोबर तुम्ही प्रवासाला येतां का ? या असीम आकाशांतील अनेक सौंदर्यें मी तुम्हांला दाखवीन. रंगीत पिसारा फुलवणारा व्याधाचा तारा, शुभ्र संथ तेजाची धार धरणारी शुक्राची चांदणी, चंद्रांची माळ गळ्यांत घालून फिरणारा शनी, लक्षावधि श्वेतकमळं जिच्यांत उमललीं आहेत ती आकाशगंगा ! आपण याल तर—"

ऋषींनीं असहायपणें परस्परांकडे पाहिलें. 'हो' म्हणण्याचें सामर्थ्य अथवा धैर्य आतां कोणांतहि राहिलें नव्हतें.

"आमची निष्ठा अचल आहे. कोठलेंहि सौंदर्य आम्हांला मोह पाडूं शकत नाहीं!" एकजण कसाबसा उत्तरला.

धूमकेतु निघून गेला आणि ऋषिमंडळ पूर्ववत् खालीं मान घालून प्रदक्षिणा घालूं लागलें! पण ती निष्ठा—

## रस्ता 

मध्यरात्र उलटून गेली !

हा रस्ता आतां एकटा आहे.

कांहीं काळापूर्वी बारा घण्टाध्वनि कोठून तरी दुमदुमले आणि अन्धारलेल्या आकाशांत विरून गेले.

बारा पक्षी !

काळाच्या गुहेंतून पाठोपाठ बाहेर पडलेले बारा पक्षीच होते ते !

संपलेल्या दिवसाचे शेवटचे धागे आपल्या चोंचींत घेऊन ते उडून गेले !

अनेकांचे शेवटचे श्वास, अतृप्त आशा आणि अखेरचीं स्वप्नें त्या धाग्यांत गुंतलेलीं असतील !

हा रस्ता मात्र कर्तव्याच्या श्रमांतून त्याच क्षणीं मुक्त झाला !

त्या बारा घंटाध्वनींच्या स्वरलहरी—

त्या बारा काळ-पक्ष्यांच्या छाया

याच्यावरून तरंगत गेल्या

आणि यानें मुक्ततेचा निःश्वास टाकला !

× × ×

हा रस्ता आतां एकटा आहे !

त्याच्या दोन्हीं कडा किनारणारे दिवे आपापल्या स्तंभांच्या अग्रावरून प्रकाशत आहेत.

पान्थस्थांना मार्गदर्शन करणारे ते किरण आतां या रस्त्यावरील धुळींत मिसळत आहेत, शिलाखंडांना बिलगून बसलेले आहेत.

रणांगणावर जखमी होऊन पडलेल्या वीराच्या अंगावर—

परिचारिकेनें आपला स्नेहमय हात ठेवावा

त्याप्रमाणें हे दिवे या एकाकी रस्त्याला आपल्या प्रकाशकरांनीं गोंजारत आहेत !

हा रस्ता आतां एकटा आहे.

विश्रांति आणि एकान्त, थकलेल्या वाटसरूंप्रमाणें त्याच्या कडेला बसलेलीं आहेत !

दिवसभराच्या अखण्ड श्रमानन्तर तो आतां विश्रांति घेत आहे.

अनेक मानवांचे चरण याच्या शरीरावर पडले,

अनेक वाहनांचीं कठोर चक्रें याच्या जीवनावर आघात करून गेलीं !

त्या आघाताचे व्रण अजूनहि त्याच्या शरीरावर दिसत आहेत.

त्या पदक्षेपाच्या खुणा अद्याप बुजलेल्या नाहींत.

दुर्जन आणि सज्जन

पंडित आणि अपंडित

धनाढ्य आणि निर्धन

सर्वांच्या पावलांना त्यानें आपल्या वक्षःस्थळावर अवसर दिला.

त्याच्या सेवावृत्तीनें पक्षपात केला नाहीं, पारख केली नाहीं, भेदभाव केला नाहीं !

आक्रमण करणाऱ्या प्रत्येक पायाला

आपलें जीवन तुडविण्याची त्यानें मुभा दिली !

× × ×

अज्ञात पान्थस्था, पुढें सरकूं नकोस !

त्याच्या अल्पकालीन विश्रांतींत व्यत्यय आणूं नकोस,

त्याचें शिणलेलें शरीर दुखवूं नकोस !

त्याचें पादाक्रान्त अंतःकरण एखाद्या चन्देरी स्वप्नांत निमग्न झालें असेल.

त्या स्वप्नांत—

क्षणाक्षणानें, अंशाअंशानें आपला उद्धार होत आहे,

सभोंवारच्या वृक्षांवर बसणारे असंख्य पक्षी आपल्या पंखावर आपल्याला आकाशांत वाहून नेत आहेत—

त्या नील अनन्तांत—

तारकांनीं खचलेल्या आकाशगंगेंत आपलें रूपान्तर होत आहे—

ज्या रुपेरी रस्त्यावरून काळाशिवाय कोणाचींहि पावलें पडूं शकत नाहींत—

ज्या रत्नखचित पाऊलवाटेनें परमेश्वराशिवाय कोणीहि प्रवास करूं शकत नाहीं !

मुक्ततेच्या औट घटकेंतील त्याचें हें सुन्दर स्वप्न आपल्या पदप्रहारानें—

हे अज्ञात पान्थस्था, भंग करूं नकोस !

## सारंगिया

१८

नाहीं, आपण समजतां तें खरें नाहीं.

किनखापी गवसणींतून माझी सारंगी बाहेर पडते ती धनासाठीं नव्हे.

तारांच्या या समुदायावरून माझी धनुकली फिरूं लागते ती आपलें मनोरंजन करण्यासाठीं नव्हे.

त्या उभयतांच्या मीलनांतून मी मधुर रागरागिण्यांची बरसात करतों ती कीर्तीसाठीं नव्हे.

मला धन मिळत असेल, कीर्ति मिळत असेल, आणि आपलें मनोरंजनहि होत असेल.

पण यांतील कोणत्याहि गोष्टीसाठीं मी सारंगीला स्पर्श करीत नाहीं.

मी सांगणार आहें तें आपल्याला खरं वाटणार नाहीं कदाचित्, पण तें खरें आहे.

सारंगींतून निघणारे स्वर मला दिसतात म्हणून मी सारंगी वाजवतों. ते पुनःपुन्हां दिसावे म्हणून मी सारंगिया झालों.

मोहळाला स्पर्श करतांच त्यांतून असंख्य मधमाशा चारी दिशांना उडूं लागाव्या

त्याप्रमाणें माझ्या धनुकलीचा तारांना स्पर्श होतांच त्यामधून ध्वनि-लहरींचा एक जथा बाहेर पडून उडूं लागतो.

तारांवर बसलेलीं लहान लहान पांखरेंच जणूं माझी धनुकली उठवून देते!

कांहीं स्वरलहरी पाण्याच्या धारेसारख्या रुपेरी असतात, कांहीं रमणींच्या गालांवरील लज्जेप्रमाणें आरक्त असतात, कांहीं फुललेल्या अंगाराप्रमाणें ताम्रवर्ण असतात, कांहीं निळ्या असतात, कांहीं सोनेरी असतात, कांहीं चांदण्यासारख्या चंदेरीहि असतात.

मीं तार छेडली कीं या विविधरंगी ध्वनिपुष्पांचा दाट माण्डव माझ्याभोंवतीं घातला जातो.

आणि एका विलक्षण आनंदानें माझें अंतःकरण बेहोष होतें.

माझ्या हातांतील धनुकली तारांवर फिरत असते आणि माझे मिटलेले डोळे त्या सुंदर लहरींचा मागोवा घेत असतात.

नृत्यांगना आपल्या झिरझिरीत वस्त्राचा पिसारा फुलवते त्याप्रमाणें त्या स्वरलहरी आपल्या रंगांचा सुरम्य विस्तार करतात.

आणि नाचत नाचत, हांसत खेळत, गात आणि गुणगुणत, मागें वळून पहात, खालीं वांकून बघत मेघमंडलापर्यंत जातात आणि अंतर्धान पावतात.

हें अलौकिक दृश्य पुनःपुन्हा दिसावें म्हणून मी सारंगिया झालों.

निवडुंगाच्या फडांतून मला कण्हण्याचा आवाज ऐकूं आला म्हणून मीं जवळ जाऊन पाहिलें.

विदीर्ण झालेला एक मोठा थोरला पतंग काट्यांच्या शरपंजरीं पडला होता.

मीं चौकशी करतांच आपली कहाणी तो मला सांगूं लागला,

"आकाशांत मी खूप उंच गेलों होतों." तो म्हणाला "कागद असूनसुद्धा पक्ष्यांसारखा मी आभाळांत संचार करीत होतों. जमिनीवरून स्वप्नांसारखे भासणारे मेघ आतां आपल्या जवळ आले आहेत असें मला वाटलें. आनंदानें

आणि अभिमानानें मी धुन्द झालों. आणखी खूप खूप वर जायचें, चांदण्यांच्या जगांत प्रवेश करायचा असें मीं ठरविलें.

" तेवढ्यांत माझी आणि एका पक्षाची आभाळांत भेट झाली. त्याच्या फडफडणाऱ्या क्षुद्र पंखांची आणि रंगहीन सौंदर्याची मीं कुचेष्टा केली आणि त्याला सांगितलें: तूं आकाशांत संचार करणारा आहेस पण मी आकाशाला जिंकणारा आहें.

" पक्षी उत्तरला नाहीं. माझ्यामागें जमिनीपर्यंत खालीं गेलेल्या सूत्राकडे त्यानें एक तिरस्काराचा कटाक्ष टाकला आणि तो पुढें निघून गेला.

" ती अवहेलना मला सहन झाली नाहीं. या सूत्रबंधनामुळें मी आकाशावर विजय मिळवतों असें या पक्ष्यांना वाटतें काय? माझें स्वतंत्र सामर्थ्य सिद्ध करण्यासाठीं मीं आवेशानें तें बंधन तोडलें. थोडा वेळ मी आणखी उंचावर गेलों—

" आणि नंतर वाऱ्यावर हेलकावे खात या निवडुंगांत येऊन पडलों!"

## निवान्त २०

मंडई दूर राहिली आहे

कोलाहल विरून गेला आहे

या निर्जन एकान्तांत हा 'निवान्त' उदासपणानें उभा आहे.

सायंकाळच्या सावल्या त्याच्यावर चहूंकडून निथळत आहेत.

रात्रीचीं पावलं त्याच्या अंगणांत ऐकूं येत आहेत.

कौलारावर रेंगाळत राहिलेला एक सोनेरी पक्षी पंख पसरून दूर उडून जात आहे !

अंधार...एकान्त...

आणि क्षितिजावर उदय पावलेली ती शुक्राची चांदणी...

" जग हें मिथ्या आहे " तो म्हणाला.

मीं विचारलें, " जगाचे बुद्धीला आणि शरीराला जें ज्ञान होतें तें खरें नाहीं का ? "

" बुद्धि आणि पंचेंद्रियें हीं सारीं त्या मिथ्या जगांतच अंतर्भूत असल्यामुळें त्यांच्या द्वारें होणारें ज्ञानहि मिथ्या, असत्य आहे. "

" तसें असेल तर " मी उत्तरलों " हा मिथ्या-वादहि असत्य ठरतो. कारण मिथ्या जगांतील मिथ्या बुद्धीला स्फुरलेला हा एक तर्क आहे. तो सत्य असूंच शकणार नाहीं. जग सत्य आहे असें म्हण-णारांना असत्याचा तरी आधार असतो. जग मिथ्या, असत्य म्हणणाऱ्यांना तोहि आधार नाहीं ! "

## इंद्र



मानवांचा स्वामी, अमरांचा अधिपती आणि या सप्तसमुद्र पृथ्वीचा पालनकर्ता—

या अलौकिक विशेषणांचीं निरांजनें हे इंद्रा, तुझ्या सुवर्णासनापुढें अनादि कालापासून उजळत आहेत

ऋषींनीं आणि राजांनीं तुझ्या चरणाची पूजा केली आहे, तुझीं स्तोत्रें गायलीं आहेत

पृथ्वीवरची प्रदीर्घ रात्र संपून पहिल्या उषःकालाचा उदय झाला

तेव्हां क्षितिजावरील रत्नजडित सिंहासनावर हे दैवता, मानवांना तुझेंच प्रथम दर्शन झालें

त्या प्रकाशमंदिरांत तूंच आपल्या अनंत शक्तीं-
सह प्रगट झालास

अगणित अंतःकरणांतून उमटलेल्या अपौरुषेय
शब्दांनीं तुझें स्तवन झालें

आणि तूं मानवाला अभय दिलेंस.

× × ×

हे अमरेंद्रा, तुझ्या वैभवाला पारावार नाहीं.

तुझ्या स्वर्गनगरीच्या वेशींवर इंद्रधनुष्यांच्या
कमानी आहेत

आंत स्फटिकांचीं भुवनें आहेत

मार्गावर इंद्रनीलांचें आच्छादन आहे

जागोजाग कल्पलतांचे कुंज आहेत !

पाण्याच्या प्रवाहांत चान्दणें मिसळलें आहे

आणि वातावरणांतील अणुरेणू मधुर सुगंधानें
ओथंबले आहेत.

त्या वैभवांत राहूनहि—

पाषाणमृत्तिकेनें आच्छादलेल्या पृथ्वीवरील आम्हां
मानवांकडे

हे ईश्वरा, तुझी दृष्टि लागलेली आहे.

× × ×

ज्याच्या प्रत्येक थेंबांतून साक्षात् अग्नीचें वास्तव्य आहे

ज्याच्या प्रत्येक लहरीवर एकेक मनोहर स्वप्न तरंगत आहे तो सोमरस हे इंद्रा, तुला प्रिय आहे.

त्या अग्निरसाचें सेवन करून, तो स्वप्नमधू प्राशन करून तूं आपल्या रथांत आरूढ झालास

प्रत्यक्ष सामर्थ्याला घायाळ करण्याचें सामर्थ्य ज्यांत आहे तें वज्र तूं धारण केलेंस

आणि मानवांना संत्रस्त करणाऱ्या असुरांचें

तिमिराच्या त्या गर्वाढ्य उपासकांचें

तूं निर्दालन केलेंस।

× × ×

हे संग्रामदैवता, त्या सामर्थ्याची प्रचीति आज आम्हांला पुन्हा येऊं दे.

तुझा सुवर्णरथ—

ज्याच्या सुकेश अश्वांची गति वादळासारखी आहे

ज्याचा गतिनाद मेघगर्जनेप्रमाणें वातावरण दुमदुमून टाकतो

ज्याच्या चक्रभाराखालीं चांदण्यांचा चुरा होऊन ती रुपेरी धूळ सर्वत्र उडूं लागते

ज्याचा आवात चुकवण्यासाठीं क्षितिजें भीतीनें मागें सरकतात आणि दिशा दूर होतात

तो तुझा सुवर्णरथ

एखाद्या विराट् दावानलाप्रमाणें या आकाशांतून अमित वेगानें संचार करूं दे.

× × ×

दानवांचा संहार करण्यासाठीं आपल्या सेवकांना सहाय्य करणाऱ्या पराक्रमा,

पृथ्वीवरचे सारे जलप्राह तुझ्या अंकित आहेत.

जीवनाचा संचय करणारे समुद्र जागे होऊन आपल्या लक्षावधी लाटांचे हात क्रोधानें वरती उगारूं दे.

मदोन्मत्त हत्तीप्रमाणें भासणारे मेव तुझें परिजन आहेत

रणमृदुंगाप्रमाणें त्यांच्या गर्जितांनीं दुर्बळांत बळाचें आणि अचेतनांत चैतन्याचें स्फुरण होऊं दे.

आकाशाचा भेद करणारी भयानक सौदामिनी तुझी दासी आहे तिच्या रुद्र तेजाचे कण आमच्या अंतःकरणांत प्रविष्ट होऊं दे.

आमच्या क्षीण हातावर—
तुझ्या दिव्य सामर्थ्याचें अल्प दान पडूं दे.
त्या कृपाप्रसादाच्या सहाय्यानें—
तूं वज्रानें महान् पर्वतांचा चुराडा केलास
त्याप्रमाणें मानवाला बद्ध करणारे हे सारे तट
आम्ही उध्वस्त करूं !

## चित्रकार २३

कलामन्दिर

खिडकीवरचे झालरी पडदे सरकले.

चित्रकारानें चित्रफलक समोर घेतला.

छोट्या चिनई पेल्यांत रंगांचें सुरम्य मिश्रण होऊं लागलें.

समोर बसलेल्या सुन्दर युवतीनें

शरीरावरील शेवटचें वस्त्र बाजूला केलें.

× × ×

खालील रस्त्यांत

सहस्रावधी मानवांचा क्रुद्ध समुद्र उसळत होता, गर्जत होता.

तीं रणगर्जितें—

खिडकीवरील जांभळ्या झुळझुळीत पडद्यांना स्पर्श करूं लागलीं.

× × ×

युवतीनें मधुर स्मित केलें.

तिच्या विवस्त्र सौंदर्यावर त्या स्मितानें चांदणें पसरलें.

चित्रकारानें कुंचली उचलली. पेल्यांतील पिवळ्या रंगांत लालगुलाबी रंगाच्या छटा मिसळल्या

कुंचली फलकावर विहरूं लागली.

× × ×

गर्जनांचा आवेश अनावर झाला.

विराट् समुदायाचा ज्वालामुखी जागा झाला, धगधगूं लागला.

त्यांतून उफाळणाऱ्या ज्वाला

जांभळ्या पडद्यांना स्पर्श करून आकाशांत जाऊं लागल्या.

× × ×

नजरेंतील चंद्रज्योती

त्वचेचे मृदु मखमली पोत

उन्मादानें भरलेले छातीवरील सुवर्णकुंभ

ओंठावरचा चमकता ओलावा
स्मितांतून उमललेली यौवनाची अहन्ता !
चिनई पेल्यांतील संमिश्र रंग-
आनंदानें पुलकित झालें होतें.

× × ×

रस्त्यांतील समुदायांत मृत्यूचीं पावलें ऐकूं येऊं लागलीं.
घोड्यांच्या लोखंडी टापा
बंदुकांचे भयानक आवाज
मरणाऱ्यांच्या किंकाळ्या
मृत्यूलाहि क्षुद्र लेखणाऱ्या त्या अमर ललकाऱ्या !
जांभळा पडदा फडफडूं लागला.

× × ×

ती स्तिमित झाली.
कोणाचें चित्र हें ?
मखमलीवर रक्तसिंचन झालें होतें
नजरेंत चंद्रज्योती नव्हत्या, निखारे होते
ओठावर स्मित नव्हतें, आव्हान होतें !
यौवनांत नाहणाऱ्या सुन्दरीचें चित्र नव्हतें तें
तर संहारासाठीं बाहेर पडलेल्या रुद्र लोकदेवतेचें होतें !

शस्त्रें हिचा छेद करूं शकत नाहींत
अग्नि हिचें दहन करूं शकत नाहीं
पर्जन्यानें ही आर्द्र होत नाहीं
आणि वादळानें ही नम्र होत नाहीं.
आमची स्वातंत्र्याकांक्षा !

× × ×

ही रक्तानें नाहते आहे
पण हिच्या डोळ्यांत पाणी नाहीं
शस्त्राघातानें ती विद्ध झाली आहे
पण तिच्या अंत:करणांत भय नाहीं
ती जखमांनीं जखमी होत नाहीं, ती

परामवानें पराभूत होत नाहीं.
आमची स्वातंत्र्याकांक्षा !

× × ×

जीवनानें ती प्रज्वलित होते
मृत्यूनें ती अमर होते
संग्रामांत सामर्थ्य
त्यागांत तेजोमयता
तिला प्राप्त होतात
आमची स्वातंत्र्याकांक्षा !

× × ×

सोन्याच्या सिंहासनांचा चुरा करणारी
सम्राटांचे मुकुट मातीला मिळवणारी
गुलामांना मानव करणारी
दासांना स्वामी करणारी
संहार करणारी आणि सेवा करणारी
आमची स्वातंत्र्याकांक्षा !

# शिलाखंड



एका उंच डोंगरमाथ्यावर पडलेला एक शिला-खंड होता तो.

तेव्हां मेघ त्याच्यावर निर्मळ उदकाचा अभिषेक करीत.

उषःकालच्या देवता त्यावर दंवबिंदूंचें सिंचन करीत.

सूर्याच्या तेजांत आणि चंद्राच्या चांदण्यांत तो न्हाऊन निघे.

भोंवतालचे हिरवे दूर्वांकुर आपल्या चिमकुल्या पात्यांनीं त्याला हळूंच स्पर्श करीत.

हरीण आणि त्यांचीं पाडसें त्याच्या अंगावर मान टाकून केव्हां विसावा घेत.

सर्प आपल्या शीतल शरिरांचा केव्हां त्याला विळखा घालीत.

आकाशाच्या सावलींत—

आणि या सर्वांच्या संगतींत–

एका उंच डोंगरमाथ्यावर तो तेव्हां रहात होता.

× × ×

आतां तो एका मन्दिरांत आहे.

मंदिर वैभवशाली आहे

नामांकित कारागिरांनीं तें बांधलें आहे आणि थोर कलावंतांनीं तें शोभिवन्त केलें आहे.

शिल्पकारानें त्याचें स्वतःचें स्वरूपहि पालटून टाकलें आहे.

काळ्या आणि ओबडधोबड अशा त्या शिला-खंडाचें—

आतां एका मनोहर देवमूर्तींत रूपान्तर झालें आहे.

त्याच्या अंगावर जरीचीं वस्त्रें आहेत. गळ्यांत, मनगटांत आणि पायांत सोन्याचे व रत्नाचे अलंकार आहेत.

दिवसांतून तीन वेळां श्रीमंती थाटानें त्याची पूजा होते.

मंजूळ वाद्यांचा गजर होतो

आणि शेकडों भक्त त्याला वंदन करून त्याचा जयजयकार करतात.

× × ×

आणि हें सर्व होत असतांना

कोणाला न ऐकूं येणाऱ्या, न समजणाऱ्या शब्दांत तो स्वतःशीं पुटपुटत असतो,

"केवढा अधःपात झाला माझा! माझ्या सुखपूर्ण जीवनाचा किती दुःखपूर्ण शेवट हा!"

## फुलमाळी



मला फुलमाळी म्हणतात—
पण मी फुलांचे हार गुंफीत नाहीं
फुलांची विक्री करीत नाहीं
फुलांचे ताटवे फुलवीत नाहीं
त्यांच्या संरक्षणासाठीं काट्यांचीं कुंपणें घालीत नाहीं

मी फुलांचा विक्रेता नाहीं, फुलांचा उपासक आहें.

सौन्दर्य आणि सुगन्ध—
या अद्वितीय गुणांचे हे चिमुकले समास पाहून मी बेहोष होतों.

सुगंधाचा मागोवा घेत

रानावनांतून मी प्रवास करतों

आणि पानांच्या हिरव्या शय्येवर पडलेल्या त्या यक्षकन्यांचें दर्शन घेऊन कृतार्थ होतों !

मी फुलांचा संचय करतों

पण हार करण्यासाठीं नव्हे, विक्रीसाठीं नव्हे

तर सौन्दर्य आणि सुगन्ध यांच्या सहवासासाठीं.

माझ्या अंतःकरणांतील सुन्दर, सुगन्धी स्वप्नें फुलांच्या रूपानें वेलींवर साकार होतात.

त्या स्वप्नांचा मी संचय करतों, फुलांचा नव्हे !

सीमान्त प्रदेश हिमानें आच्छादलेला आहे
निष्पर्ण झाडांच्या कृश कुरूप फांद्या
अस्थिपंजरासारख्या भयाणतेनें उभ्या आहेत
जीवनाचे संचय जागोजाग थिजले आहेत
बर्फानें माखलेला वारा आकाशांत घोंगावत आहे
कोठेंहि पुष्पाचा गंध नाहीं, कोठेंहि पक्ष्याचें कूजन नाहीं !

× × ×

सराईतील महोत्सव समात झाला आहे
भैरवीचे स्वर काळोखांत विरून गेले
मदिरेचा पेला रिकामा झाला

नृत्यांगनांच्या यौवनाचा मादक फुलोरा
क्रूर तांबड्यालाल पडद्यामागें अंतर्धान पावला
भयानक शान्तता ! भयानक एकटेपणा !
कोठेंहि मदिरेचा थेंब नाहीं, कोठेंहि नूपुराचा नाद नाहीं !

× × ×

ही एकाकी सावली विषण्णतेनें वाट चालत आहे.
मानवाची सावली पण मानवी शरीराशिवाय !
रस्त्यांतून घरांतून हाटांतून रानांतून
आपलें हरवलेलें शरीर ती शोधीत आहे !
दिव्याच्या खांबाजवळून जातांना लाजणारी,
प्रकाशांत संकोचणारी, काळोखांत भिणारी
एकाकी रुक्ष सावली ! शेवटीं—
जीवनाला किनारणाऱ्या सावल्यांच्या समुद्रांत मिळून जाणार आहे !

## शैवांची प्रार्थना २८

कैलासाच्या हिमपर्वतावर विहार करणाऱ्या हे रुद्र दैवता,

ज्वालामुखीप्रमाणें क्रुद्ध होऊन

वादळी समुद्राप्रमाणें बेहोष होऊन

झंझेच्या गतीनें, विजेच्या निर्दयतेनें

या मानवी जगावर पाऊल टाक

आणि लोहाच्या आघातानें काचपात्राचा चुरा करावा

त्याप्रमाणें

या जगाचा संहार कर !

× × ×

नीलगिरीवर उमेसह क्रीडा करणाऱ्या महेश्वरा,

तुझ्या अदय रूपाचें आम्हांला आज दर्शन दे.

दोन्ही डोळ्यांतून निखाऱ्यांचा पाऊस पडत आहे.

गळ्याला विळखा घालणारा नाग क्रोधानें धुस-फुसत आहे.

त्रिखंडाला भयकंपित करणाऱ्या मृदंगावर तुझा संतप्त हात प्रहार करीत आहे.

त्या नादाच्या तालावर तुझे सहस्रावधी गण

तुझ्या सभोंवार तांडवनृत्य करीत आहेत,

त्या संमिश्र गर्जनांच्या भैरव नादानें आकाशाचे तुकडे पडत आहेत,

तारा निखळत आहेत, पर्वत उन्मळत आहेत,

धुराच्या आणि धुळीच्या अजस्त्र ढगांनीं सारें विश्व धुमाळून गेलें आहे !

× × ×

भिल्लवेषानें मृगया करणाऱ्या दैवता,

संहारानेंच या मानवी जगाचें संरक्षण होणार आहे

हा अधोगत मानव—

खोट्या दैवतांचा पुजारी

खोट्या नीतिमत्तेचा पहारेकरी

रानटी भावनांचा मांडलिक
मनाला मारणारा, मानवतेला विकणारा,
दुर्बळांना तुडवणारा, नरमांस-भक्षक !
त्याच्या सृष्टीचा संहार कर
त्याच्या अंतःकरणाचें संरक्षण कर !
मानवांच्या सृष्टीमधून
जखमी, विवस्त्र, हद्दपार होऊन बाहेर पडलेली
मानवता
कैलासाच्या पायथ्याशीं
शिलाखंडावर मान टाकून
आर्तस्वरानें तुला आवाहन करीत आहे !
संसार हितासाठीं हलाहल सेवन करणाऱ्या
उदार नीलकण्ठा,
त्या हतप्रभेचा कैवार घेऊन
तिला विद्ध आणि व्यथित करणाऱ्या
या जुलमी जगाचा संहार कर !

चिमुकल्या पांखरा, येथें आपलें घरटें बांधूं नकोस !

तुला ठाऊक नाहीं का ही स्मशानभूमि आहे ?

ही जिवंत जगाची सरहद्द आहे.

जीवनाच्या शवावर येथें अग्नि पसरलेला आहे.

आणि त्या अग्नीच्या ज्वालांमध्यें—

अजिंक्य आशांची आणि सुंदर स्वप्नांची रक्षा होत आहे.

उमलत्या स्वप्ना, येथें आपलें घरटें बांधूं नकोस.

× × ×

ज्या वृक्षाच्या शाखेवर बसून तूं कूजन करीत आहेस—

आणि घरटें उभारीत आहेस–

त्याच्या चारी बाजूंस चिता भडकलेल्या आहेत,

चितांच्या ज्वालांनी आणि धुरानें तो वृक्ष काळ-वंडला आहे,

मृतप्राय झाला आहे.

एखाद्या ओबडधोबड, अवजड पिशाच्चाप्रमाणें तो या स्मशानभूमीवर कधींपासून उभा आहे.

वसंतकाळ आला तरी तो पल्लवित होत नाहीं,

वर्षाकाळ आला तरी तो निर्मळ होत नाहीं,

आपले काजळलेले, अस्थिमय हात आकाशा-कडे करून मृत्यूच्या दारांतील हा रखवालदार

स्वतःच्या मृत्यूची प्रतीक्षा करीत आहे !

आपल्या पंखावर जीवनांतील आनंद वाहून नेणाऱ्या विहंगा,

या वृक्षावर तूं वास्तव्य करूं नकोस.

× × ×

चिमुकल्या गायका, उषःकालच्या सुवर्ण प्रका-शांत तूं आपलीं मंजुळ गीतें गाऊं लागलास म्हणजे या स्मशानांतील आम्हां झाडाझुडपांना अवर्णनीय आनंद होतो.

खुरटलेलीं आणि काळवंडलेलीं आमचीं शरीरें, अव्यक्त आनंदानें शहारतात.

आमचीं अचेतन, उदासीन अंतःकरणें हर्षानें थरथरतात.

तुझ्या प्रत्येक गीतस्वराबरोबर एकेक रुपेरी स्वप्न आमच्या सभोंवार तरळूं लागतें.

आमच्या विरक्त आणि वनवासी जीवितांत हे सोन्याचे क्षण घेऊन येणाऱ्या आकाशपुष्पा,

तुझ्याविषयीं आम्हांला अथांग कृतज्ञता वाटते.

ती कृतज्ञताच तुला पुनःपुन्हा आळवून सांगत आहे–

या भूमीवर तूं आपलें घरटें बांधूं नकोस.

× × ×

जेथें जीवनाचा विलास आहे, सृष्टीचा उल्हास आहे,

जेथील हिरव्यागार पर्णसंभारावर आणि पुष्पांच्या पाकळ्यांवर काळपुरुषाची सावली पडलेली नाहीं,

जेथें निर्झरसरिता किनाऱ्यांशीं गुजगोष्टी करीत हर्षभरानें वाहात आहेत,

जेथें सम्राट वसन्तानें आपला चिरंतन दरबार थाटला आहे

त्या जीवनमय जगांत हे चिमुकल्या पान्थस्था, तूं प्रयाण कर.

× × ×

आपले चिमुकले पंख पसरून तूं जाऊं लागलास म्हणजे आम्ही दुःखी होऊं;

पण तूं निघून गेलास, आकाशांत दिसेनासा झालास म्हणजे आम्ही सुखी होऊं. आमची प्रीति, आमची कृतज्ञता सुखी होईल.

तूं गेल्यावर रोज आम्हां सर्वांना तुझें स्मरण होईल आणि तुझ्या आठवणी काढीत आम्ही म्हणूं,

'आपल्या काजळी आयुष्याला एकदां तरी सुखाचा, स्नेहाचा सोनेरी स्पर्श झाला होता!'

चिमुकल्या मित्रा, तेवढ्याच समाधानाचे आम्ही अधिकारी आहोंत.

## अश्रू

३०

अंत:करणांत उमललेला, पापणींतून ओघळलेला
पाकळीवर पडलेल्या दंवाप्रमाणें
चकाकणारा पाण्याचा थेंब !

× × ×

हा अबल आहे, भीरू आहे,
अपराधाप्रमाणें लज्जित होऊन तो अडखळतो,
दास्याप्रमाणें भयभीत होऊन तो थरथरतो,
आणि तरीहि—
या चिमुकल्या थेंबांतच
मानवाचें अखेरचें सामर्थ्य आहे !

× × ×

संग्रामांत जखमी झालेली,
रक्तानें नाहलेली, धुळीनें माखलेली
मानवता
अंगावरचीं जीर्ण लक्तरें सावरीत,
अधोवदन होऊन परमेश्वरासमोर उभी राहील
तेव्हां—
या लहानशा थेंबाकडे पाहूनच
परमेश्वर तिला क्षमा करील
आणि हृदयाशीं धरील !

## चांदणी



शुक्राची तेजःपुंज चांदणी पाहून तो वेडा झाला.

त्यानें शुक्रावर जावयाचें ठरविलें

आपलें अर्धें आयुष्य खर्च करून त्यानें एक प्रचंड शिडी तयार केली.

आणि एके दिवशीं तो शुक्रावर चढून गेला.

संतुष्ट दृष्टीनें त्यानें तेथून आकाशाकडे पाहिलें

शुक्राइतकीच तेजःपुंज अशी एक नवी चांदणी आकाशांत तळपत होती.

उर्वरित अर्धें आयुष्य खर्च करून त्यानें पुन्हां एक प्रचंड शिडी सिद्ध केली.

आणि तो पृथ्वीवर आला !

## आकाशाचें ओझें

३२

एका उंच पिंपळाच्या शिखरावर ती लहानगी चिमणी बसली होती. आपले दोन्हीं पंख तिनें पसरले होते.

सारें बळ एकवटून पिंपळाचा शेंडा तिनें कवळून ठेवला होता.

ती हालत नव्हती, चिवचिवत नव्हती. तिच्या चेहऱ्यावर कांहीं विलक्षण गांभीर्य दिसत होतें. तिच्या इवल्याशा डोळ्यांतून विलक्षण तेज ओसंडत होतें.

क्षण गेले, घटका गेल्या, दिवस जाऊं लागला. पण ती होती तशी राहिली.

तिच्या आप्तमित्रांना नवल वाटलें. अनेक चिमण्या तिच्याजवळ चिवचिवत आल्या आणि विचारूं लागल्या, ' चिऊताई, हें असं काय करतां हो ? काय होतंय् तुम्हांला ? '

ती बोलतां बोलेना. एकाग्र दृष्टीनें नुसती त्यांच्याकडे पहात राहिली.

सर्व चिमण्या चिवचिव करीत तिच्याजवळ सरकूं लागल्या. तिला काय होतंय् हें पाहण्याचा प्रयत्न करूं लागल्या.

त्याबरोबर ती एकदम आवेशानें ओरडली, ' मागें सरा, मला धक्का लावूं नका ! नाहक साऱ्या पृथ्वीचा नाश होईल ! '

चिमण्यांना कांहींच कळेना. साऱ्याच गोंधळांत पडल्या. शेवटीं एक चतुर चिमणी पुढें येऊन म्हणाली, ' चिऊताई, पंख उघडून तुम्ही गंभीरपणानें पिंपळावर कां बसल्या आहांत हें आम्हांला कळलंच पाहिजे. नाहीं तर आम्ही सर्वजणी मिळून तुम्हांला इथून उठायला लावूं ! या पिंपळावर तुमची एखादी आळई किंवा काडी हारवली आहे काय ? '

' आळई आणि काडी ! ' चिऊताई उद्वेगानें हांसून म्हणाली, ' क्षुद्रांच्या मनांत क्षुद्र विचारच

येणार ! बायांनो, मी आकाशाचं ओझं माझ्या पंखा-
वर उचलून धरलेलं आहे ! '

' म्हणजे ? ' सर्व जणी चिवचिवल्या !

' त्याचं असं झालं ' चिऊताई सांगूं लागल्या,
' आज सकाळीं या पिंपळावर बसून मी उडण्याच्या
विचारांत असतां एक भयंकर आवाज झाला आणि
सारं आकाश खालीं कोसळून पडलं ! सर्वांत उंच
अशा या झाडावर मी असल्यानें तें अर्थात्च माझ्या
पंखावर आलं. तेव्हांपासून तें प्रचंड ओझं मीं
उचलून धरलं आहे. मी उठलें तर आकाश खालीं
पडेल आणि पृथ्वीचा चक्काचूर होईल, साऱ्या प्राणि-
मात्रांचा नाश होईल ! '

चिमण्यांनीं तिची समजूत घालायचा खूप प्रयत्न
केला. आकाश पडत नाहीं आणि पडलं तरी
आपल्या पंखामुळें आडत नाहीं असं सर्वांनीं तिला
सांगितलें.

—पण तिची समजूत पटली नाहीं. चिमण्या
निघून गेल्या आणि आकाशाचें ओझें पंखावर घेऊन
ती चिमणी पिंपळावर बसून राहिली !

कोणाजवळ सुंदर, सुगंधी फुलांच्या राशी होत्या.

कोणाजवळ अमोल रत्नांचे हार होते.

कोणाजवळ भरजरी देदिप्यमान् वस्त्रें होतीं.

आणि कोणाजवळ कांचनाचे वैभवशाली अलंकार होते.

तो मात्र, आपलें दारिद्य गर्दीत दडवून दाराजवळच्या जमावांत उभा होता !

ललकारी झाली, माता दरबारांत आली, सिंहासनावर अधिष्ठित झाली.

नजराणे येऊं लागले.

तिच्या पायांशीं रत्नांचे आणि फुलांचे, सोन्याचे आणि वस्त्रांचे खच पडले !

तिच्या डोळ्यांत आसवं तरंगलीं.

लोकांना वाटलें, मातेला आनंद झाला, तिचीं आसवं आनंदाचीं आहेत.

पण त्यानें ओळखलें—

तो गर्दीतून वाट काढीत पुढें झाला आणि दर-वाजांतून मातेकडे जाऊं लागला.

त्याच्या मलीन, जीर्ण वस्त्राचा स्पर्श होऊं नये म्हणून सर्वांनीं बाजूला सरून त्याला वाट दिली.

तो मातेच्या चरणाजवळ गेला.

कट्यारीनें त्यानें स्वतःचें मनगट उपसलें आणि त्यांतील उष्ण रक्ताचा मातेच्या पायावर अभिषेक केला.

त्याचा तो रक्ताळलेला हात धरून मातेनें त्याला उठविलें आणि सिंहासनावर आपल्या शेजारीं बसविलें.

दाराजवळच्या दरिद्री जमावानें त्याचा जयजय-कार केला आणि दरबारांतले मानकरी विस्मयानें आणि उद्वेगानें स्तब्ध झाले.

## पायरीचा पाषाण

३४

एका वैभवशाली देवालयाच्या पायरीचा पाषाण होता तो. देवालय वैभवशाली होतें, त्याप्रमाणें त्याची पायरीहि वैभवशाली होती. काजळासारख्या काळ्या आणि रेशमासारख्या मऊ अशा संगमरवराचा तुकडा होता तो.

मंदिरांतील देवाचे आम्ही उपासक रोज त्या पाषाणाला तुडवून आंत जात होतों. भक्तजनांच्या पावलांचे प्रहार तो वर्षानुवर्षे आपल्या वक्षःस्थलावर सहन करीत होता.

मीं एकदां त्याला विचारलें, ‘या परिस्थितीचा तुला संताप येत नाहीं का ? या पददलित अवस्थे-

तून मुक्त होण्याची महत्त्वाकांक्षा तुला कधीं अस्वस्थ करीत नाहीं का ?'

तो पाषाण उत्तरला, 'या मंदिराचा आणि मंदिरांतील मूर्तींच्या विनाशाचा क्षण तोच माझ्या मुक्तीचा क्षण ! त्या क्षणाची मी वाट पहात आहे !'

'तो क्षण जवळ येण्यासाठीं तूं काय करीत आहेस ?' मीं विचारलें.

'प्रार्थना ! परमेश्वराची प्रार्थना !' पाषाण उद्गारला. 'मी आशा करतों कीं एक दिवस माझी प्रार्थना सफल होईल, विश्वांतील विध्वंसक शक्तीचें लक्ष या मंदिरांकडे वळेल आणि मंदिराच्या विध्वंसांतून माझ्या मुक्तीचा उदय होईल.'

× × ×

आणि लौकरच त्या पाषाणाची प्रार्थना खरोखरीं सफल झाली. विश्वांतील विध्वंसक शक्तीचें लक्ष त्या मंदिराकडे गेलें; विद्युल्लतेच्या आघातानें देवालय कोसळून पडलें, उध्वस्त झालें !

ज्या ठिकाणीं ती प्रासादतुल्य इमारत उभी होती तेथें केवळ चित्रविचित्र पाषाणखंडांच्या राशी पसरल्या. क्रमानें व रंगवार लावलेला गंजिफांचा डाव पिसून, उधळून द्यावा त्याप्रमाणें, मंदिराचें सारें बांधकाम पिसलें आणि उधळलें गेलें.

त्या राशींत छिन्नविच्छिन्न झालेला मूर्तीचा दगड आणि पायरीचा पाषाण हे एकाच जागीं परस्परांना बिलगून पडले होते.

मीं पाषाणाला म्हटलें, 'अखेर तुझी मुक्ति झाली ! तुझी महत्त्वाकांक्षा सफल झाली. ज्या मूर्तीच्या दर्शनासाठीं लोक तुला पायाखालीं तुडवीत, ती भग्न होऊन तुझ्या शेजारीं पडली ! तूं अद्यापहि विषण्ण कां ?'

'सान्या मंदिराचा विध्वंस झाला याचें मला वाईट वाटतें. मीं तसें म्हटलें खरें, पण खरोखरी माझा राग मूर्तीवर होता. मंदिरावर नव्हे !'

'मग आतां कसली प्रार्थना करतोस तूं ?'

'हें देवालय पुन्हां उभारलें जावें आणि त्यांत–'

× × ×

पाषाणाची तीहि प्रार्थना सफल झाली. देवालय पुन्हां उभारलें गेलें. पूर्वीचें वैभवशाली स्वरूप त्याला पुन्हां प्राप्त झालें. सकाळसायंकाळ उपासकांची गर्दी पुन्हां त्या मंदिरांत होऊं लागली.

पण पायरीच्या पाषाणाची आतां मूर्ति झाली होती आणि पायरीच्या जागीं एका नवीन पाषाणाची स्थापना झाली होती.

मीं त्या नवीन मूर्तीला विचारलें, 'तुझ्या सर्व महत्त्वाकांक्षा आतां सफल झाल्या. दाराशीं होतास तो गाभाऱ्यांत आलास, पण अजूनहि तूं विषण्ण दिसतोस तें कां ?

'विश्वांतील विध्वंसक शक्तीचें लक्ष पुन्हां या मंदिराकडे वळेल कीं काय याची मला भीति वाटते!'

'मग कसली प्रार्थना करतोस तूं आतां ?'

'पायरीच्या जागीं असलेल्या त्या नवीन पाषाणाची प्रार्थना परमेश्वरानें ऐकूं नये ही!' पाषाण उत्तरला.

दीप-देवता अंतरिक्षांतून आज माझ्या घराकडे येत आहे.

पण तिचें स्वागत मी कसें करूं ?

तिच्या पद-स्पर्शानें अभ्रखंडांचें सुवर्ण-पुंज होत आहेत.

क्षितिजावर प्रकाशाचीं फुलें फुलत आहेत.

निळ्या अंतराळांत सोन्याची धूळ पसरत आहे.

तेजाच्या असंख्य धारा सर्वत्र लहरत आहेत !

—आणि माझ्या घरांत, माझ्या अंतःकरणांत मात्र अथांग काळोख दाटलेला आहे !

त्या तेजोदेवतेचें स्वागत मी कसें करूं ?

× × ×

माझीं लाडकीं मुलं—माझं घर उजळ करणाऱ्या त्या जिवंत ज्योति—

हा शृंखलांचा आवाज ऐकलांत ?

त्या खळखळाटांतून अस्पष्ट हांक येत आहे—आई !

अन्यायाच्या आणि असत्याच्या पाषाणांनीं बांधलेल्या उंच भिंती—

माझ्या घरांतला सारा प्रकाश त्या भिंतींच्या आड बंदिवान झालेला आहे !

त्यांची गुदमरलेली साद माझ्या कानावर येते आणि माझीं आसवं मला अनावर होतात.

× × ×

हा रस्ता आहे कीं रणांगण आहे ?

त्यावर पाचोळ्याप्रमाणें कलेवरांच्या राशी पडल्या आहेत !

माझीं सहस्रावधि बाळं अन्नासाठीं आक्रोश करीत तेथें शेवटचे श्वास सोडीत आहेत.

आपल्याच भूमीवर निराश्रित झालेलीं माझीं असंख्य अपत्यें मरणाचा आश्रय घेत आहेत.

माझ्या हृदयावर होणाऱ्या या जखमा, हे आघात —हे आनंद-देवते, मला तुझं स्वागत करतां येत नाहीं.

छातीवर दाबून धरलेला हा हात रक्तानें माख-लेला आहे.

त्या हातानें मी तुझ्या चरणाला कसा स्पर्श करूं ?

× × ×

मला क्षमा कर. मी विसरलें कीं, तूं केवळ आनंद-देवता नाहींस, तर समरदेवताहि आहेस !

तूं चंद्रिकेप्रमाणें आल्हादक आहेस, पण दावा-नलाप्रमाणें दाहकहि आहेस !

हे अग्नि-देवते, तूं विकास करूं शकतेस आणि विध्वंसहि करूं शकतेस !

ओल्या डोळ्यांनीं मी तुझें स्वागत करतें.

रक्तानें माखलेल्या हातांनीं मीं तुझें पूजन करतें.

आणि तुझ्याजवळ एकच वर-दान मागतें—

तुझें दाहक आणि संहारक स्वरूप प्रगट कर !

## आलिंगन ३६

तुझ्या केतकीसारख्या गौरवर्ण

आणि मखमलीसारख्या मृदुल बाहूंनीं माझ्या शरीरालाच नव्हे—

तर माझ्या अवघ्या जीवनाला आलिंगन दे !

त्या उद्दाम विळख्यांत

माझें हें अस्वस्थ, अचपळ हृदय धुक्यांत गुंतलेल्या पहांटच्या प्रकाशांसारखें

गुंतून जाईल, गुदमरून जाईल.

आणि जीवनमरणाच्या सीमारेषा दिसेनाशा होतील !

कां हलक्या आवाजांत तूं मला अशी वारंवार हांक मारतोस ?

रस्त्यांतील रहदारींतून मार्ग काढतांना आणि दुतर्फा दिसणारी नगरांतील आरास बघतांना

तुझी ती हांक माझ्या कानावर पडते आणि पायाखालचा रस्ता कोठें जात आहे हें समजेनासें होऊन मी जागच्या जागीं उभा राहतों.

रसिक मित्रांच्या संगतींत हास्यविनोद करतांना अथवा मद्याचा पेला भरतांना

तुझी ती हांक मला ऐकूं येते आणि कांपऱ्या हातानें मद्याचा पेला खालीं ठेवून मी उदासपणानें उठून जातों.

रातराणीच्या सुगंधानें वेढलेल्या महालांत प्रण-
यिनीच्या उष्ण शरीराला बाहुपाशांत ओढतांना

तुझी ती अस्पष्ट हांक कानावर येते आणि मी
बर्फाच्या पुतळ्याला विळखा घालीत आहें असा
मला भास होतो.

कां हलक्या आवाजांत तूं मला अशी वारंवार
हांक मारतोस ?

## समाधिलेख



दीड शतक माझ्या मायभूमीला नागाप्रमाणें विळखा घालून बसलेली गुलामगिरी येथें समाधिस्थ झाली आहे.

भुकेल्या राक्षसिणीप्रमाणें असंख्य माणसांच्या रक्तमांसांचें तिनें सेवन आणि भक्षण केलें.

या सुपीक भूमींतील सामर्थ्याचा तिनें संहार केला आणि तिच्यावर दुर्बळतेचे मळे लावले.

स्वातंत्र्याच्या जन्मसिद्ध हक्कासाठीं झुंज देणाऱ्या वीरांना तिनें पायाखालीं तुडविलें.

पित्याच्या मनगटांतील बळ, मातेच्या स्तनांतील दूध आणि बालकाच्या मुखावरील हास्य तिनें हिरावून घेतलें.

परंतु या वैरिणीनेंच—

अमर नररत्नांची एक देदीप्यमान् माळ माझ्या मायभूमीला अर्पण केली.

जीमधील एकेक रत्नासाठीं इतर देशांना एकेक शतकाची तपस्या करावी लागते!

आणि म्हणूनच—

या समाधिस्थ गुलामगिरीला मी कृतज्ञतेनें पहिलें आणि अखेरचें अभिवादन करतों.

सूर्याच्या प्रखर तापानें सर्व आकाश धगधगलें आहे.

आणि त्या प्रज्वलित आकाशांत—

हा एकच अभ्रखंड एकाकीपणें तरंगत आहे !

अग्नीच्या प्रलयांत जीवनाचा हा शेवटचा प्रतिनिधी अशरण वृत्तीनें प्रवास करीत आहे.

उजाड वाळवंटांतील एकाच जलस्थानाप्रमाणें—

हताश जीवनांतील अखेरच्या आशेप्रमाणें—

ग्रीष्मानें दग्ध केलेल्या शेवटच्या वेली पुष्पाप्रमाणें—

हा एकाकी अभ्रखंड अंगारमय आकाशांत तरंगत आहे !

वर्षाकालीन मेघांप्रमाणें हा प्रचंड नाहीं, बलाढ्य नाहीं, सामर्थ्यशाली नाहीं.

त्याच्या आवर्तीभोंवतीं लहानमोठ्या ढगांचें दळ नाहीं.

सौदामिनीचा संतप्त आसूड त्याच्या संरक्षणासाठीं सभोंवार कडाडत नाहीं.

दिग्गजांना थरकांप करणारी भीमगर्जना तो करूं शकत नाहीं.

तो लहान आहे, बलहीन आहे आणि एकाकी आहे.

पण त्याची दया करूं नका !

तो इतका क्षुद्र नाहीं !

हताश जीवनांतील ही शेवटची आशा नाहीं !
संग्रामशील जीवनांतील हें शेवटचें शौर्य आहे !

वाळवंटांत विरंगुळा उत्पन्न करणारें हें अचेतन जलस्थान नाहीं, पहाड फोडीत जाणाऱ्या जलप्रवाहाचा हा वारसदार आहे.

धुळींत गळून पडणारें हें कोमल सौंदर्य नाहीं, स्वाभिमानी जीवनाचा हा उन्माद आहे,

आणि म्हणूनच......

तें पहा, आपल्या या लहान, बलहीन अभ्रखंडानें
अखेरीं सूर्याला ग्रासून टाकलें !

अग्नीच्या त्या विराट् आश्रयस्थानाला पराभूत
करून

कांहीं क्षण कां होईना, त्याच्या उग्र तापांतून
पृथ्वीची मुक्तता केली आहे !

## पण किती उशीरां ! ४०

दार उघडलंस, पण किती उशीरां !

रात्रभर तुझ्या दाराशीं उभा राहून मी तुला साद घालतों आहें.

कानांत जीव आणून कानोसा घेतों आहें.

वाटलें, तुझ्या पायांतील नूपुर रुमझुमतील,

तुझ्या हातांतील सुवर्णकंकणें किणकिणतील,

कटिबंधावरील रत्नजडित मेखलेची कुजबुज कानीं येईल, आणि हे सर्व नाद—

त्या सर्व नादांहून अधिक रमणीय, अधिक मंजुळ अशा त्या एका नादांत—

दाराची कडी निखळल्याच्या नादांत-विलीन होतील ! परंतु तूं आली नाहींस !

× × ×

संवत्सराचें रूप घेऊन एकेक क्षण माझ्यासमोरून जात होता.

प्रवासानें श्रांत झालेलीं माझीं पावलें त्या काल-प्रवाहांत तुझ्या उंबरठ्याचा आधार घेऊन—

पुरांत खडकाला बिलगून राहणाऱ्या पर्णाप्रमाणें निश्चल उभीं होतीं !

पायांत थकवा होता, डोळ्यांत आशा होती, कानांत बधीरता होती आणि अंतःकरणांत या सर्वांचें संमेलन होतें !

यात्रेंतील रंगीबेरंगी दुकानांकडे ओढ घेणाऱ्या बालकाला पित्यानें ओढून न्यावें—

त्याप्रमाणें काळ तुझ्या दारापासून मला दूर ओढण्याचा प्रयत्न करीत होता.

पण मी गेलों नाहीं.

आणि तूंहि आली नाहींस !

× × ×

हिमाप्रमाणें शीतल अशा वाऱ्याच्या लहरी—

शिशिरकालीन आकाशाचे ते उदासीन उसासे—
माझ्या शरीराला जेव्हां वेढून टाकीत
तेव्हां सहस्र सर्पांचा अंगाला विळखा पडल्या-
प्रमाणें मला वाटे !
वृक्षांचीं पानें तळाशीं गळून पडत होतीं,
आणि त्या मृतपर्णांची यात्रा पुनरुज्जीवनाचा शोध घेत वाऱ्यावर मार्गक्रमण करीत होती !

प्रत्येक क्षणाला मृत होणाऱ्या माझ्या आशाहि—
दुसऱ्या क्षणीं आपलीं थडगीं दुभागून बाहेर येत.
आणि तुझ्या आगमनाची प्रतीक्षा करूं लागत.
परंतु तूं आलीच नाहींस !

× × ×

गहन अंधारांत सारा संसार निद्रांकित झाला होता.
तुझ्या दर्शनासाठीं ज्या नगराच्या सीमा उल्लंघून मी आलों तें आपल्या अगणित दीपज्योतींसह काळोखांत अदृश्य झालें होतें !
जगांतील सर्व जीवन आपली गति थांबवून विश्रान्त झालें होतें !

यौवन प्रणयाच्या

बाल्य वात्सल्याच्या

आणि वार्धक्य वैराग्याच्या

बाहुपाशांत विसांवलें होतें !

पाखरांचे चिमुकले जीवसुद्धां आपल्या उबदार घरट्यांमध्यें परस्परांच्या पिसाऱ्यांत गुरफटले होते.

मी मात्र तुझ्या दाराशीं—

आकाशांतील असह्य शिशिरता सहन करीत तुझी प्रतीक्षा करीत होतों.

वाटलें, तुझे आश्रयपूर्ण बाहुपाश, उबदार वक्षःस्थळ आणि उष्ण अधरस्पर्श—

या शिशिरतेची भरपाई करतील !

परंतु—

× × ×

दार उघडलेंस, पण किती उशीरां ?

आकाशांत फुललेला स्वप्नांचा सारा मोहर आतां गळून गेला आहे.

रात्र काळोखासह अंतर्धान पावली आहे.

आणि त्या काळोखासह—

काळोखांतच उमलूं शकणारें तुझ्या मीलनाचें स्वप्नहि निघून गेलें आहे !

पूर्वेचें क्षितिज रक्तवर्ण रेषांनीं किनारलें जात आहे.

प्रकाश उदयाला येत आहे !

आणि या प्रकाशानें तुझ्यामाझ्यांत अजिंक्य अंतर निर्माण केलें आहे !

दार उघडलंस, पण किती उशीरां !



